**महानिर्मिती कंपनीच्या सौर ऊर्जा प्रकल्पासाठी के.एफ.डब्ल्यू जर्मन बँकेकडून प्राप्त झालेल्या कर्जाच्या रकमेचे समायोजनाने वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग,**
**शासन निर्णय क्र. निधिवि-२०१७/प्र.क्र.४४(७)/ऊर्जा-३**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२.
दिनांक -३१ मार्च,२०१७

<u>संदर्भ</u> - १. शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१६/.क्र.८९/अर्थ-३, दि. २० एप्रिल, २०१६; दि. २३ ऑगस्ट, २०१६ ; दि. ४ जानेवारी, २०१७ व दि.०८ फेब्रुवारी २०१७.
२. महानिर्मिती कंपनीचे पत्र क्र. MD/MSPGCL/GOM/No.०२४०८, दि. ८ मार्च, २०१७.
३. शासन निर्णय क्र. समायोजन-२०१६/प्र.क्र.९९(३)/ऊर्जा-३, दि.३१मार्च, २०१७

**<u>प्रस्तावना</u> :-**

महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीच्या धुळे जिल्ह्यातील मौ.शिवाजीनगर येथील १५० मेगावॅट सौर ऊर्जा प्रकल्प, या बाह्य सहाय्यित प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या पुढाकाराने के.एफ.डब्ल्यू जर्मन बँकेकडून दोनशे पन्नास मिलियन युरो इतके कर्ज मंजूर झाले आहे. के.एफ.डब्ल्यू जर्मन बँकेकडून मिळणारी कर्जाची रक्कम केंद्र शासनाकडून भारतीय रिझर्व्ह बँकेमार्फत थेट महानिर्मिती कंपनीला वितरीत होत असली तरी ती राज्य शासनाच्या लेख्यांमध्ये वर्ग केली जाते. प्रस्तुत प्रकल्पासाठी राज्य शासनाच्या लेख्यात वर्ग झालेली रक्कम कंपनीला वितरीत करण्यासाठी स्वतंत्र लेखाशिर्ष उपलब्ध नसल्यामुळे महालेखापाल कार्यालयाने कर्जाच्या रकमा निलबन खात्यामध्ये वर्ग केल्या होत्या. ह्या रकमा दीर्घ कालावधीसाठी निलंबन खात्यामध्ये वर्ग करुन ठेवणे योग्य नसल्यामुळे त्या योग्य त्या लेखाशीर्षाखाली वर्ग करुन पुस्तकी समायोजन करण्याबाबत महालेखापाल कार्यालयाने सूचित केले आहे. सदर प्रयोजनासाठी वित्तीय वर्ष सन २०१६-१७ मध्ये रु.१५०,५९,००,०००/- इतकी तरतूद करण्यात आली आहे. सदर तरतदीमधून रु.२५,६०,५५,५३४/- इतकी रक्कम उपरोक्त संदर्भ क्र.३ अन्वये समायोजनाद्वारे वितरीत करण्यात आली असून उर्वरित रक्कमेपैकी रु.१,९५,८२,४६६/- समायोजनाने महानिर्मिती कपंनीस वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचारधीन होता.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनीच्या धुळे जिल्ह्यातील मौ. शिवाजीनगर येथील १५० मेगावॅट सौर ऊर्जा प्रकल्प, ह्या बाह्य सहाय्यीत प्रकल्पासाठी केंद्र शासनाच्या पुढाकाराने के.एफ.डब्ल्यू जर्मन बँकेकडून दोनशे पन्नास मिलियन युरो इतके कर्ज मंजूर करण्यात आले आहे. त्यानुसार महानिर्मिती कंपनीला सन २०१६-१७ मध्ये मंजूर झालेल्या तरतूदीमधून रु.१,९५,८२,४६६/- (रुपये एक कोटी पंच्याण्णव लाख ब्याऐंशी हजार चारशे सहासष्ठ फक्त) इतकी रक्कम पुस्तकी समायोजनाद्वारे वितरीत करण्यास मंजूरी देत आहे.

२. या शासन निर्णयान्वये मंजूर करण्यात आलेल्या कर्जाची रक्कम ज्या कारणासाठी मंजूर करण्यात आलेली आहे,त्याच कारणासाठी उपयोगात आणली जाईल याची खातरजमा करावी.

३. वरील बाबींचा खर्च "मागणी क्रमांक के-११, ६८०१ वीज प्रकल्पासाठी कर्जे, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे (००), (००)(०४) सौर ऊर्जा प्रकल्पासाठी के.एफ.डब्ल्यू जर्मन बँकेकडून महाराष्ट्र राज्य वीज निर्मिती कंपनीला कर्जे, ६८०१०६६५ योजनांतर्गत ५५ कर्जे व आगाऊ रकमा" या लेखाशिर्षा खाली खर्ची टाकावा व तो सन २०१६-१७ या वित्तीय वर्षासाठी मंजूर असलेल्या तरतुदीमधुन समायोजित करण्यात यावा.

४. सदर रकमेचे पुस्तकी समायोजन महालेखापाल मुंबई यांचे अखत्यारित व अधिकरारत करण्यात येत असल्याने या रकमेचे देयक तयार करण्यात येऊ नये.

५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१ यांनी त्यांच्या अखत्यारीत व अधिकारात रु.१,९५,८२,४६६/- (रुपये एक कोटी पंच्याण्णव लाख ब्याऐंशी हजार चारशे सहासष्ठ फक्त) चे पुस्तकी समायोजन करुन शासनास तसे कळवावे.

६. दि.२० एप्रिल २०१६ च्या परिपत्रकान्वये, अर्थसंकल्प अंदाज वितरण व संनियंत्रण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरित करण्यापूर्वी या परिपत्रका सोबतच्या परिशिष्टात नमूद केलेल्या बाबींसाठी तपासणी सूचीप्रमाणे सर्व बाबींची तसेच परिच्छेद क्र. ७ ते १८ मधील प्रत्येक अटीची व परिशिष्टातील अनु.क्र. ३ व ९ मधील अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणाणित करण्यात येत आहे.

७. वित्त विभागाच्या दि.२०/०४/२०१६ च्या परिपत्रकान्वये मासिक विवरण पत्रानुसारचा निधी जून ते डिसेंबर या कालावधीमध्ये पुढे / मागे ओढून घेण्याची सुविधा दिलेली आहे. तसेच वित्त विभागाच्या दिनांक ०८/०२/२०१७ च्या परिपत्रकात नमूद केलेल्या परिच्छेद क्र. २ ते ६ मधील प्रत्येक अटीची पूर्तता झाल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.व सदर परिपत्रकान्वये निधी वितरणाचे अधिकार प्रशासकीय विभागास देण्यात आले आहेत. त्यास अनुसरुन सदर निधी वितरीत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.inया संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्र. २०१७०३३१२११२४१६३१० सा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vilas Mahadeorao Rajurkar

Digitally signed by Vilas Mahadeorao Rajurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Industry, Energy And Labour Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=83469494bac86099a320f3e14bf8421ee9d2b48e344470b76ea2595df04951b4, serialNumber=02c5c00269dd48836be0d9939bdff848a9ff1f1a9fd195baf3a104d09b0817d9, cn=Vilas Mahadeorao Rajurkar
Date: 2017.04.01 01:35:27 +05'30'

**(वि.म.राजुरकर)**

शासनाचे अवर सचिव

**प्रत:-**

१) व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य विद्युत निर्मिती कंपनी मर्यादित, प्रकाशगड, वांद्रे, (पूर्व), मुंबई-५१

२) महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

३) महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-४०००२०.

४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
५) अधिदान व लेखा अधिकारी, अराप / रालेवि-१), मुंबई.
६) अधिदान व लेखा अधिकारी, अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई.
७) निवासी लेखा अधिकारी, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०००५१.
८) अवर सचिव (रोख), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
९) विशेष कार्य अधिकारी (ऊर्जा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -३२.
१०) क.अ.अधिकारी (प्रशा-५), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२.
११) वित्त विभाग, (अर्थसंकल्प-१३ / साधनसंपत्ती / साऊ / व्यय-१६) मंत्रालय, मुंबई-३२.
१२) मुख्य विद्युत निरीक्षक, उद्योग,ऊर्जावकामगारविभाग,सार्वजनिक बांधकाम प्रशासकीय इमारत, कर मार्ग रामकृष्ण चेंबूर, ३ रा मजला, चेंबुर, (पूर्व), मुंबई-४०००७१.
१३) मुख्य अभियंता (विद्युत) जल विद्युत प्रकल्प, मुंबई ४००००१
१४) कक्ष अधिकारी(ज.वि) जल संपदा विभाग,मंत्रालय मुंबई.
१५) निवडनस्ती (ऊर्जा-३) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई -४०००३२